**अपंग व्यक्ती अधिनियम १९९५मधील तरतुदीनुसार केंद्र शासनाच्या सामाजिक न्याय व अधिकारिता मंत्रालय, नवी दिल्ली यांनी अपंगांसाठी सुनिश्चित केलेली पदे <u>राज्य शासनाच्या आस्थापनांवरील पदांना लागु करणेबाबत</u>**

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः- न्यायाप्र- २०११/प्र.क्र. ४ /सुधार-३
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- **१७ मार्च, २०११**

**वाचा :-** १) अपंग व्यक्ती (समान संधी, हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५
२) शासन परिपत्रक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. अपंग-२००४/प्र.क्र.५३५/सुधार-३, दि.२७.१२.२००४
३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. न्यायाप्र-२००९/प्र.क्र.५/ सुधार-३, दि.३.७.२०१० चे पत्र
४) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. न्यायाप्र-२००९/ प्र.क्र.५/सुधार-३, दि.३.८.२०१०
५) मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे रिट याचिका क्र.३२९४/२०१० वरील दि.१५.१.२०११ चे आदेश
६) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचे क्र.न्यायाप्र-२०११/प्र.क्र.४/ सुधार-३, दि.८.२.२०११ चे पत्र

<u>**प्रस्तावनाः-**</u> अपंग व्यक्ती अधिनियम १९९५ मधील कलम ३३ नुसार केंद्र व राज्य शासनाच्या अखत्यारितील आस्थापनेवरील अपंग व्यक्तींसाठी ३ % एवढी पदे आरक्षित ठेवण्याची तरतूद करण्यात आली आहे. अशी पदे सुनिश्चित करण्यासाठी अधिनियमातील कलम ३२ नुसार तज्ञ समिती गठित करण्यात आलेली आहे. त्यानुसार केंद्र व राज्य शासनाने कार्यवाही करुन अपंगांसाठी पदांची सुनिश्चिती करुन ३ % प्रमाणे पदे भरणे आवश्यक आहे.

२. वरील तरतूदीनुसार राज्य शासनाने तज्ञ समिती गठित करुन राज्य शासनाच्या अखत्यारितील पदनिश्चितीबाबतचे आदेश विविध विभागामार्फत निर्गमित करण्यात आले आहेत व त्याप्रमाणे अपंगांची पदे भरण्याची कार्यवाही सुरु आहे, तथापि अपंगांसाठी सुनिश्चित केलेली पदे योग्यरित्या सुनिश्चित झालेली नाहीत. तसेच अपंगासाठी आरक्षित असलेल्या पदांवर योग्यरित्या व पात्र अपंग उमेदवारांची नियुक्ती करण्यात येत नाही अशा व अन्य मुद्दयांबाबत मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे जनहित याचिका क्र. ७१/२००२, ७५/२००६, १२९/२००३, १३९/२००६, ५४/२००७, २२५/२००९, ४४/२००९,११८/२०१० आणि रिट याचिका ३२९४/२०१० दाखल करण्यात आलेल्या आहेत. सदरहू

जनहित /रिट याचिकांवर वेळोवेळी झालेल्या सुनावणीच्या अनुषंगाने दिलेल्या निदेशानुसार राज्य शासनाच्या विविध विभागांमार्फत वेळोवेळी पदांची सुनिश्चिती करुन अपंगांसाठी आरक्षित पदे भरण्यात आलेली आहेत.

३. रिट याचिका क्र.३२९४/२०१० या याचिकेसह अन्य जनहित याचिकांवर मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिनांक १५.१.२०११ रोजी विशेष सुनावणी घेऊन अंतरिम आदेश दिलेले आहेत. अंतरिम आदेशांमध्ये विविध बाबीसंदर्भात मा. उच्च न्यायालयाने विहित मुदतीत कार्यवाही करण्याचे निदेश दिलेले आहेत. त्यापैकी केंद्र शासनाने त्यांच्या आस्थापनेवरील अपंगासाठी सुनिश्चित केलेल्या गट-अ,ब,गट-क व गट-ड पदांबाबत अनुक्रमे अधिसूचना दि.१८ जानेवारी,२००७, दि.१५.३.२००७ व दि.१५.३.२००७ रोजी प्रसिध्द केलेली आहे. सदर यादीनुसार राज्य शासनाच्या अखत्यारितील पदांबाबत एकत्रित आदेश काढण्याबाबत निदेश आहेत.

४. वरीलप्रमाणे केंद्र शासनाने त्यांनी गठित केलेल्या तज्ञ समितीच्या वेळोवेळी बैठका घेऊन संबंधित पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या आणि कामाचे स्वरुप विचारात घेऊन सविस्तर यादी प्रसिध्द केलेली आहे. सदर अधिसूचना राजस्थान, गुजरात, उत्तरप्रदेश आणि उतरांचल या राज्यांनी त्यांच्या आस्थापनांवरील पदांसाठी लागू केली असल्याचे जनहित याचिकेच्या सुनावणीच्या वेळी निदर्शनास आणून दिलेले आहे. त्यानुसार या विभागाच्या दि.८.२.२०११ च्या पत्रान्वये सर्व मंत्रालयीन विभागांना केंद्र शासनाच्या यादीनुसार त्यांच्या विभागाच्या अखत्यारितील पदांची सुनिश्चिती करुन यादी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागास एकत्रितरित्या आदेश निर्गमित करण्यासाठी उपलब्ध करुन देण्याबाबत सूचना देण्यात आलेल्या आहेत. तथापि त्याप्रमाणे संबंधित विभागांकडून यादी उपलबध करुन देण्यात आलेलो नाही. त्यामुळे सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागास राज्य शासनाच्या अखत्यारितील पदांची सुनिश्चिती करुन एकत्रित पदांची यादी प्रसिध्द करता आलेली नाही.

५. वरील सर्व बाबी व मा. उच्च न्यायालयाने वेळोवेळी दिलेल्या आदेशानुसार केंद्र शासनाच्या सामाजिक न्याय व अधिकारिता मंत्रालयाची दि.१८ जानेवारी,२००७, दि.१५.३.२००७ व दि.१५.३.२००७ ची अधिसूचना राज्य शासनाच्या अखत्यारितील पदांना लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>** केंद्र शासनाच्या सामाजिक न्याय व अधिकारिता मंत्रालय, नवी दिल्ली यांनी भारत सरकारच्या विशेष अधिसूचना भाग-१ ( सेक्शन-१) दि.१८ जानेवारी,२००७, दि.१५ मार्च,२००७ व दि. १५ मार्च, २००७ नुसार केलेली पदनिश्चिती राज्य शासनाच्या अखत्यारितील

आस्थापनांवरील विविध पदांकरिता खालीलप्रमाणे या शासन निर्णयान्वये लागू करण्यात येत आहे :-

१) केंद्र शासनाने अपंगासाठी सुनिश्चित केलेली गट-अ, गट-ब , गट-क व गट-ड मधील जी पदे राज्य शासनाच्या आस्थापनेवर समान आहेत अशी पदे सुनिश्चित करण्यात येत आहेत.

२) केंद्र शासनाने प्रसिध्द केलेल्या यादीतील ज्या पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या, कामांचे स्वरुप व ६ व्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी समान आहेत अशा पदांची पदनामे जरी भिन्न असली तरी ती अपंगांसाठी सुनिश्चित राहतील

३) केंद्र शासनाच्या यादीमध्ये वरील अनुक्रमांक १ व २ व्यतिरिक्त जी पदे अस्तित्वात आहेत अशा पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या व कामाचे स्वरुप इत्यादीसह माहितीचा तपशिल तज्ञ समितीसमोर सादर करण्यासाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडे पाठवावा.

४) वरील अनुक्रमांक ३ येथील पदे तज्ञ समितीकडून सुनिश्चित झाल्यानंतर त्याची एकत्रित यादी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने निर्गमित करेल.

५) वरील अनुक्रमांक १ व २ प्रमाणे अपंगासाठी सुनिश्चित असलेली पदे तातडीने भरण्याची कार्यवाही येत्या ३ महिन्यात पूर्ण करावी.

६) अपंगांची पदे भरण्यासाठी देण्यात येणारी जाहिरात ही राज्यस्तरावरील किमान २ मराठी व इंग्रजी वर्तमानपत्र तसेच शासनाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करावी.

वरील निर्णयानुसार अपंगासाठी पदनिश्चिती प्रमाणे पदे भरली जाणार असल्याने संबंधित विभागाने पदनिश्चितीबाबत यापूर्वी निर्गमित केलेले आदेश आपोआप रद्द होतील.

सर्व मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील नियुक्ती प्राधिकरणांना सदरहू आदेशानुसार कार्यवाही करण्याच्या सूचना देण्यात याव्यात व अपंगासाठी आरक्षित असलेली पदे कोणत्याही परिस्थितीत ३ महिन्यात भरली जातील याबाबत संबंधितांना सक्त सूचना देण्यात याव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०११०३१७१८१६३४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(दिनेश वाघमारे )
सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति :-
मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. मंत्री (सा.न्या) यांचे खाजगी सचिव

मा. राज्यमंत्री (सा.न्या) यांचे खाजगी सचिव
सर्व अप्पर मुख्य सचिव /प्रधान सचिव / सचिव मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, बँक ऑफ इंडिया बिल्डींग,हुतात्मा चौक,मुंबई (पत्राने )
सर्व विभागीय आयुक्त
आयुक्त,अपंगकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक, वि.जा.भ.ज. व इ.मा.व. संचालनालय,पुणे
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
सर्व समाजकल्याण अधिकारी,जि.प.
विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती-सुधार-३